# नूतन संवत्सर

## पूर्वसूरींची धारणा

## लेखन क्रमांक : ३

युधिष्ठिरशक ५१०५ शालिवाहनशक १९२५
शिवशक ३२९ - ३३० सुभानुनाम संवत्सर
ऋतूनां कुसुमाकरः। गीता उत्तरायण वसंतऋतु

आमच्या पूर्वजांचें भव्य व उदात्त मानस तुम्हाला जगांत कोठेहि पाहण्यास मिळणार नाही.

चैत्रमास, सुभानुनाम संवत्सर, शके १९२५, वसंतऋतु, संवत्सरारंभ, अभ्यंगस्नान, वत्सराधिपति, बुधपूजन, गुढी उभारणें, पंचांगस्थ गणपतिपूजन.

या दिवशीं अभ्यंगस्नान करून गुढी उभारावी. ब्रह्मध्वजाय नमः असे म्हणून गुढीचें पूजन करावे.

ब्रह्मध्वज नमस्तेऽस्तु सर्वाभिष्ट फलप्रद।
प्राप्तेऽस्मिन्वत्सरे नित्यं मद्गृहे मंगलं कुरू।।

या मंत्राने प्रार्थना करावी. हिंदू पंचांगाप्रमाणें नवीन वर्षाला ‘नूतन संवत्सर’ अथवा ‘वर्षप्रतिपदा’ असे म्हणतात.

---------------------------------------------------------------

चैत्र शुद्ध प्रतिपदा म्हणजेच वर्षप्रतिपदा हा दिवस साडेतीन मुहूर्तापैकी एक असल्याने अत्यंत शुभ मानला जातो. फार प्राचीन काळीं ही कालगणना सुरूं झाली म्हणून या तिथीला ‘युगादि तिथी’ म्हणतात.

गुढीपाडवा मुहूर्त उत्तम वर्षारंभाचा
शुद्ध प्रतिपदा नाम जयाचे महिना चैत्राचा

गुढीपाडवा म्हणजे भारतीयांचें नवे वर्ष.

थरथरत्या चिमकुल्या दोन बोटांनी दगडी पाटीवरील ‘श्री सरस्वती प्रसन्न’ या टपोऱ्या अक्षरावरून फिरणारी पेन्सिल ! प्रत्येकाला लहानपणीच्या अशा आठवणी येत असतात.
गुढीपाडवा म्हणजे पाटी पूजनाचा दिवस. तें सरस्वती पूजन. प्रत्येकाच्या आयुष्यांत या ‘पाटी पूजनाला’ अनन्यसाधारण महत्व आहे.

सुसंस्कृति, सभ्यता, शिष्ठाचार यांचें बाळकडू असणारी त्या वेळची ही अक्षरज्ञान देणारी पाटी प्रत्येकाच्या मनांत आपले आदराचें स्थान टिकवून असते—अगदी आजच्या कॉम्प्युटर, सुपर कॉम्प्युटर असलेल्या या युगांतहि.

श्री गणेशाय नमः।। श्री सरस्वत्यै नमः।।
अथ संवत्सर फलम्।।

स जयति सिंदुरवदनो ।
देवो यत्पादपंकजस्मरणम् ।
वासरमणिरिव तमसां ।
राशीन् नाशयति विघ्नानाम् ।। १ ।।

सः देवः जयति = तो देव उत्कर्ष पावत आहे. तो कसा आहे? सिंदुर वदनः = सिंदुरासारखे मुख असलेला असा, म्हणजे आरक्तवर्ण. यत् पाद-पंकज-स्मरण = ज्याच्या पादरूपी कमलाचें स्मरण. विघ्नानाम् राशीन् नाशयति = विघ्नांच्या समूहाचा नाश करते. यासाठीं उपमा देतात— तमसां राशीन् नाशयति वासरमणि इव = अंधाराच्या राशींचा नाश करणाऱ्या सूर्याप्रमाणे. म्हणजे उदय पावलेला सूर्य

जसा अंधाराचा नाश करतो त्याप्रमाणे या देवाच्या चरण कमलांचें स्मरण विघ्नांच्या समूहाचा नाश करते. या श्लोकाचा सरळ अर्थ असा आहे—

प्रारंभीं श्री गजाननाचें स्मरण केले असतां सूर्योदय होताच ज्याप्रमाणे तिमिर समूहांचा नाश होतो, त्या प्रमाणे सर्व विघ्नांचा नाश होतो. तो सिंदुरवदन देव उत्कर्ष पावत आहे.

---

प्राप्ते नूतनवत्सरे प्रतिगृहं कुर्यात् ध्वजातोरणम्।
स्नानं मंगलमाचरेत् द्विजवरैः सार्धं सुपूजोत्सवम्।
देवानां गुरूयोषितां च शिशवोऽलंकारवस्त्रादिभिः।
संपूज्यो गणकः फलं च श्रुणुयात्तस्माच्च लाभप्रदम् ।। २ ।।

नूतन संवत्सर सुरू होतें त्या दिवशीं घरोघर ध्वज व तोरणें उभारावीत. मंगलस्नान म्हणजे अभ्यंगस्नान करून ब्राह्मणासह देवाची व गुरूंची पूजा करावी. स्त्रीया व मुलें यांना वस्त्रालंकारांनी भूषित करून उत्साह करावा. ज्योतिषांचा सत्कार

करून त्यांचेकडून वर्षफल श्रवण करावे म्हणजे वर्ष लाभप्रद होईल.

-----------------------------------------------------------

तैलाभ्यंगं स्नानमादौ च कृत्वा ।
पीयोषोत्थं पारिभद्रस्य पत्रम् ।
भक्षेत्सौख्यं मानवो व्याधिनाशम् ।
विद्यायु:श्रीर्लभ्यते वर्षमूले ।। ३ ।।

प्रथम सुगंधी तेलानें अभ्यंगस्नान करून अमृता-पासून उत्पन्न झालेल्या कडूनिंबाची कोवळी पानें आनंदानें भक्षण करावीत म्हणजे व्याधींचा नाश होऊन वर्षभर सुख, विद्या, आयुष्य व लक्ष्मी म्हणजे संपदा प्राप्त होतात.

-----------------------------------------------------------

पारिभद्रस्य पत्राणि कोमलानि विशेषत: ।
सपुष्पाणि समानीय चूर्ण कृत्वा विधानत:।। ४।।

मरीचि हिंगुलवणं अजमोदासशर्करै: ।
तिंतिणी मेलनं कृत्वा भक्षयेत् रोगशांतये।। ५।।

कडुनिंबाच्या पुष्पासहित कोवळया पानांचें चूर्ण वस्त्रगाळ करून मिरे,हिंग,मीठ,ओवा व साखर या सर्वांच्या मिश्रणासह तें चिंचेंत कालवून रोगशांती होण्यासाठीं भक्षण करावे.

पंचांगस्थं गणेशं द्विजगणकयुतं पूजयित्वार्थिवृन्दं
संतोष्यानेकदानैःपरमसुखयुतो भोजयित्वान्नमिष्टम्
शृण्वन् गीतानि वाद्यानि च विविध कथास्तद्दिनं संक्रमेतत् ।
क्रीडन् स्त्रीभिश्चसार्धं निशिरहसि नरो यावत् अब्दं सुखीस्यात् ।। ६ ।।

पंचांगस्थ गणपतीचें, ब्राह्मण व ज्योतिषी यांचें पूजन करून याचकांना यथाशक्ति दानादिकांनी संतोषवून मिष्टान्न भोजन घालावे. नाना प्रकारची गीतें, वाद्यें व पुण्यपुरूषांच्या कथा ऐकून दिवस घालवावा म्हणजे संपूर्ण वर्ष सुखाचे जातें.

---

चैत्रे पुण्यमये वसंतसमये नव्यं फलं वार्षिकम् ।
नित्यं यः शृणुयाददौघदलनं चायुर्यशः श्रीकरम्।
वेधा विष्णुहरौ रवीन्दुमहिजाः सौम्योगुरूर्भार्गवो ।
मंदोऽगःसशिखश्च शत्रुदलनं कुर्वन्तु सर्वे ग्रहाः।।

प्रतिवर्षी चैत्र महिन्यांतील पुण्यमय वसंतऋतूंत नवीन वर्षफल श्रवण केले असतां पातकांच्या ओघाचा नाश होऊन आयुष्य, यश, लक्ष्मी यांची वृद्धि होते. ब्रह्मा, विष्णु, महेश, रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरू, शुक्र, शनि, राहू, केतू हे सर्व शत्रूंचा नाश करोत.

---

आरोग्यं सविता तनोतु भवतां इंदुर्यशो निर्मलम्।
भूतिं भूमिसुता सुधांशु तनया प्रज्ञां गुरूर्गारिवम् ।
काव्य: कोमलवाग्विलासमतुलं मंदो मुदं सर्वदा।
राहुर्बाहुबलं विरोध शमनं केतु: कुलस्योन्नति ।।

सूर्य तुमच्या आरोग्याची वाढ करो.चंद्र यशाची, मंगळ ऐश्वर्याची, बुध बुद्धीची, गुरू गौरवाची व शुक्र कोमल वाणीची वाढ करो. शनि आनंद व राहू बाहुबल देवो आणि केतू तुमच्या कुलाची उन्नति करो.

---

# ।।नूतन संवत्सर।।

# वर्षप्रतिपदा गुढीपाडवा

# क्रमांक : २

आम्ही पूर्णपणें स्वत्त्वहीन होत चाललो आहोत. इंग्रजी नवीन वर्षाचें स्वागत किती धूमधडाक्यांत करतो ! आम्हाला आनंदाची एक मोठी पर्वणी वाटते ती! केवळ दीडशें वर्षांचा इंग्रजी अंमल, मात्र त्याने हजारो वर्षांच्या आमच्या समृद्ध आणि उज्वल परंपरेचें अगदी वस्त्रहरण केलें आहें. आम्ही एवढे स्वत्त्वशून्य कसे झालो? आमच्या या प्राचीन परंपरेकडे वळून पाहण्याची इच्छा सुद्धा आम्हाला होत नाही इतकी ती निकामी आणि टाकाऊ आहे का? इंग्रजी कल्चरमुळें तुमच्या जीवनांत कोणते आनंदाचे मळे फुलले आहेत ते तरी कळूं द्या.

विशाल वाचन, अवलोकन आणि प्रयोग यांतून मला जें कांहीं उमगलें तें मांडण्याचा प्रयत्न करतो—

इंग्रजी नव वर्षापेक्षां आमचें नव वर्ष किती भव्य, किती मनोहारी, दृष्टीला आणि अंत:करणाला किती प्रसन्न करणारे आहे पहा !

जुने वर्ष संपण्यास पंधरा दिवस अवधी आहे तोंवरच म्हणजे हुताशनी पौर्णिमा संपत असतांनाच वसंतऋतूचें आगमन होते. आसमन्तांतील लहानमोठया सर्वच वृक्षांची पानगळ प्रचंड प्रमाणांत सुरूं होते. जूनजरड वाळल्या पानांचा वृक्षांच्या पायथ्याशीं नुसता खच पडतों. वृक्ष पार निष्पर्ण होतात. मात्र चमत्कार पहा! वसंताच्या आगमनाची चाहूल अशी कीं, त्या निष्पर्ण वृक्षावर कोवळी कोवळी मऊ लुसलुशीत सूर्य प्रकाशांत अतिशय देखणी दिसणारी तांबुस हिरवी पालवी सर्वत्र दिसूं लागते. आमच्या नव वर्षासाठीं, त्याच्या

स्वागतासाठीं निसर्ग पंचांग न पाहतां पंधरा दिवस अगोदरच सिद्ध होतो.

गुढीपाडवा हा नववर्षाचा केवढा बहारीचा सण आहे आमचा ! हे लक्षांत घ्या.

इंग्लंडमध्यें वसंतऋतूंत सूर्यप्रकाश स्वच्छ असल्यामुळें ''स्प्रिंग सीझन'' हा मोठा उत्सव असतो. आम्हाला हा निसर्ग उत्सव अनायासे मिळाला आहे. तरीहि निसर्ग हा निसर्ग नव्हें, तर 'अज्ञेयशा भुवनसुंदर ईश्वराचें' हें वैभव आहे असेच येथें मानले जातें. आमचे सगळेच सण निसर्गाला धरून आहेत, सोडून नाहीत. मात्र वरील धारणेमुळें निसर्गाचा आस्वाद आणि आनंद घेताना आम्हाला देवाची आठवण येते. त्याचें भजन-पूजन नसलेला एकहि सण नाही.

वर्षप्रतिपदा, नूतन संवत्सर. या दिवशीं गुढी उभारून आपण कवींना आणि प्रेमीजनांना प्रिय असणाऱ्या वसंतऋतूचें स्वागत करतो. गीतेंत कृष्णाने आपल्या विभूति सांगताना म्हणजे कोण

कोणत्या वस्तूंत माझा विशेष आविर्भाव आहे हे सांगतांना 'ऋतूनां कुसुमाकरः' म्हणजे ऋतूंत मी वसंत आहे असे म्हणून या ऋतूचा गौरव केला आहे.

चैत्र शुद्ध प्रतिपदेच्या दिवशीं सारा आसमंत आनन्दांत न्हाऊन जातो. वर्षारंभाच्या या घटकेला नवजीवनाची नांदी निसर्गांत न कळत होते. ऋतुचक्राच्या प्रथम दिवसाचें स्वागत करायला सृष्टी चैतन्यमय होते.पाखरांना आमंत्रण देण्यासाठीं रानांत सांवर, पळस,पांगारा रंगांची मुक्त उधळण करत आसमंतात अगणित गुढ्या उभारतात. नवयौवनाची जाणीव झालेली सृष्टि लाजून लालेलाल होते. गणेर पिवळया रंगांत न्हाते.बेभान रंग आणि धुंद परिमळ यांनी सारा आसमंत मुग्ध होतो. पक्षी उडण्याचे विसरून मध पिण्यांत दंग होतात.त्यांच्या मंजूळ कूजनानें सारे वातावरण भारून जाते. रंग फुलांचा रानवणवा पाहतां पाहतां स्वैर उनाडतो. यांतून जन्म घेतो नवजीवनाचा एक अंकूर. कोकिळेला याच काळांत कंठ फुटतो. निर्मितीच्या या सोहळ्यासाठीं कोकिळेचें गाणें

सुरेल ताना घेत रंगतें. कोकिळेच्या साथीला आतां असंख्य सुंदर सुंदर पक्ष्यांचे मधुर ध्वनि ऐकूं येऊं लागतात. बहरलेल्या सावरीखालीं बसून आपण निसर्गाचें हें सामगान ऐकतो. रानवाऱ्यावर वहाणारे सूर टिपतो. फुललेली सांवर म्हणजे पक्ष्यांचें माहेरघरच.

प्रतिकूलाशीं सामना करीत जोमाने बहरलेली पालवी, ही चैत्र पालवी, आतां आपणाला नव वर्षाचें आगमन जाणवून देते. निसर्गांत होणारा हा चैतन्यदायी बदल,हें वातावरण, नव वर्षाच्या प्रथमदिनीं साधलेला हा दुग्धशर्करायोग,ही अपूर्व पर्वणी ! हे सर्व ध्यानीं आल्यावर आमच्या पूर्वजाविषयीं, त्यांच्या बुद्धिवैभवाविषयीं मन स्तिमित होतें आणि त्यांच्यापुढे नतमस्तक व्हावे वाटते.

वसुंधरेच्या या अशा संपन्न व प्रसन्न वातावरणांत नववर्षाचा सूर्य उगवला आहे,नव्या आकांक्षांना जन्म देणाऱ्या त्याच्या स्वागतासाठीं ही गुढी उभारली जात आहे. मोठा बांबू घेऊन,

सुगंधी तेल लावून त्याला स्नान घातले जाते. जरीचा खण, हार, गाठी, कडुनिंब हे सर्व बांधून आणि वर भांडे ठेवून गुढी उभारली जाते गुढीपाडव्याला गोड-धोड पुरण-वरण असा सगळा साग्रसंगीत स्वयंपाक केला जातो.

गुढी ही ध्वजाचीच एक अवस्था आहे.धार्मिक कार्याचा शुभारंभ धर्मध्वजाच्या आरोहणानेच होतो. जीवनाच्या आनंदी वाटचालींत गुढी-पाडव्याची ही विजयी पताका अग्रस्थानीच असावयास हवी म्हणूनच ती घराच्या प्रवेश-द्वारावरच उभी करतात. मांगल्याची विविध रूपें तिच्यांत एकवटली आहेत. ज्ञानदेवांनी गुढी ही संकल्पना अनेक रूपांत मांडली आहे.

ऐसी काय नेणो तुझिया आवडी।
जाहली प्रसन्नता आमुची वेडी।
म्हणौनी गौप्याची ही गुढी।
उभविली जगीं ।। ज्ञानेश्वरी ।।

आत्यंतिक प्रेमामुळें अंतरमनांतून प्रकटलेलें स्नेहरूप भावदर्शन म्हणजे गुढी होय. दारावरची गुढी हें आनंदाचें बहरणें आहे. जीवनांत शांतीची, नवसौंदर्याची पालवी फुटून आनंद-वसंत फुलविण्यासाठींच ही गुढी उभी आहे.

श्रीराम नवरात्राचा प्रारंभहि याच दिवसापासून होतो. आणि रामनवमीला रामजन्मानें त्याची सांगता होते. चैत्रांत सृष्टींत इतका स्वागतार्ह बदल घडतो कीं, मला नेहमी असे वाटते, वयोवृद्ध माणसाने ‘‘मी अनेक पावसाळे पाहिले आहेत’’ असे म्हणण्यापेक्षां ‘‘मी अनेक चैत्र पाहिले आहेत’’ असे म्हणावे. चैत्र हें नाविण्याचें,चैतन्याचें प्रतीक आहे. पूर्वी चैत्रांगण घालण्याची पद्धती होती. आसमंत आरोग्यदायी व्हावा ही त्यामागे धडपड आहे. कैरीचें पन्हें व कैरीची डाळ, उमलता फुलता मोगरा, पाणी शिंपडून केलेलें थंडगार अंगण. एकूणच उन्हाळा शीतल व्हावा ही दृष्टि आहे.

नववर्षदिन म्हणून लोकांनी एकत्र यावयास काय हरकत आहे? ३१ डिसेंबरला रात्रीं जागत, पीत ‘न्यू यिअर्स इव्ह’ साजरी करायची आणि दुसऱ्या दिवशीं ‘हँग ओव्हर’ म्हणत लोळत पडायचे आणि नव्या वर्षाचा १ जानेवारी हा पहिला दिवस आळसांत घालवायचा यांत काय अर्थ आहे? त्यापेक्षां गुढीपाडव्याच्या सुप्रभातीं एकमेकांना भेटणें किती आनंददायी होईल बरे!

# हुताशनी पौर्णिमा

## होळी पौर्णिमा

## क्रमांक : १

मनुष्याने, स्वत:ला निसर्गत: प्राप्त असलेलें व्यक्तित्त्व समाधानकारक आहे, असे मानणें ही एक फसगत आहे. असे असतां त्या भ्रामक व्यक्तित्त्वाच्या { Falce Indivijuality } पायावरच तो आपल्या जीवनाचा ताजमहाल उभा करतो. मानवाची ही नैसर्गिक अवस्था अनैतिक नसली तरी ती उचित { Valid } अवस्था आहे असे म्हणतां येणार नाही. शालेय शिक्षणामुळें अथवा कांहीं व्यावहारिक संस्कारामुळें माणसाच्या आंतरजीवनाचा स्तर उंचावतो, तें संपन्न होते हा

लोकभ्रम आहे. खरी स्थिती अशी आहे कीं, उचित-अनुचित, पाप-पुण्य अशा गोष्टी मानवी बुद्धिला कळणें कधीहि शक्य नाही. फार कशाला, त्याच्या बुद्धीला योग्यायोग्य काय आहे हे सुद्धां कळूं शकत नाही. मनुष्य हा विचारशील प्राणी आहे हें फसवे सत्य आहे. वास्तवांत तो विकारी आहे आणि विकारांच्या समर्थनार्थ तो विचार राबवतो इतकाच 'विचारशील' याचा अर्थ आहे. यापेक्षां त्यांत कांहींहि दम नाही हे नीट ध्यानीं घ्यावे. अखिल मानवजातीचा विवेक सदैव झोपलेलाच असतो. सर्व जगभर विचारांचे अतिप्रचंड पीक वारेमाप वाढले आहे. विचार दुसऱ्या विचाराला, तर्क दुसऱ्या तर्काला जन्म देतो. विचारानें, तर्कानें कधी सत्य जाणता येत नाही. मानवजातीचें बाह्य व्यावहारिक जीवन हें सापेक्ष सत्य आहे. तेथे विचार, तर्क मूल्यवान ठरतो. आंतरजीवनांत, जेथे निरपेक्ष सत्य निवास करते तेथे विचाराला, तर्काला कवडीइतकेहि मूल्य

नाहीं. यामुळें पाप-पुण्याची व्याख्या विचाराच्या, तर्काच्या कक्षेंत येत नाही. आणि विवेकाच्या कक्षेंत पाप-पुण्याला कधी अस्तित्वच नव्हते असा अनुभव येतो. कारण विवेकांत सरळ दर्शनच असते. विवेक ही देखणी दशा असल्यामुळें व्याख्येचा आंधळा उद्यम निरर्थक होतो. पोहण्याचा आटापिटा केल्यावरच ध्यानीं येते कीं, पाणी नव्हतेच मुळी. अज्ञानामुळें हें निरर्थक श्रम घ्यावे लागतात. मानवजात अनुकूल प्रतिकूल एवढ्याच बुद्धीच्या आधारावर आपले जीवन व्यतीत करीत असते. नफा-तोटा, फायदा-नुकसान, विजय-पराजय, सुख-दु:ख हाच माणसाच्या वर्तनाचा निकष असतो. बाकी व्यवहारांत दिसून पडणारे प्रेम, श्रद्धा, माणुसकी, औदार्य हा कांहीं संस्कारामुळें आलेला तात्पुरता उमाळा असतो. जीवनस्तर उंचावण्याला त्याची मदत होईल या भ्रमांत मानवजात जीवन समाप्त होईपर्यन्त राहते.

पशूंत नसलेली **स्वत्वाची जाणीव, तार्किक बुद्धि** आणि **वाक्शक्ति** यामुळें माणसाच्या वर्तनांत फार मोठा फरक असल्यामुळें समाजांतील एक विशाल वर्ग पशूपेक्षांहि जास्त बदनाम पावला आहे. जो सुवर्ण मध्यांत आहे तो बाह्यरूपांत व्यवस्थित दिसत असला तरी आंतरस्थिती किती समाधानकारक आहे, ही गोष्ट पशूपेक्षां विशेष निसर्गदत्त वैशिष्ठ्यांची त्याच्यांत भर पडल्यामुळें सहजासहजी लक्षांत येत नाही. यामुळेंच हाताच्या बोटावर मोजल्या जातील इतक्या अल्प व्यक्ति सोडल्या तर कोट्ट्यावधी लोकांना जीवनाच्या धन्यतेचा आणि तें सार्थकी लागल्याचा अनुभव येत नाही. आपण कृतार्थ झालो असे वाटत नाही. जीवन व्यापारांत अंतीम आयुष्यांत दिवाळे निघाल्याचाच अनुभव येतो. असे हें उपलब्धीशून्य जीवन कुचकामी ठरतें.

‘जन्मा आला हल्या आणि पाणी वाहतां मेला’

हाच अनुभव गाठीं उरतो. हे असे कां होते? याबाबत अनेकांचें म्हणणें कीं, जीवन हें असेच आहे. त्याला कांहीं इलाज नाही. तें असेच व्यतींत करायचे. ‘‘जीवनहि है जहर, तो पीनाहि पडेगा.’’ माझ्यामतें ही धनगरी, गावंढळ बुद्धि आहे. या भरतभूमींत हजारों वर्षांच्या परंपरेनें विद्यासंपन्न झालेला प्रबुद्ध असे कदापि बोलणार नाही. या सगळ्या विवेचनाचें तात्पर्य असे कीं, पशूपेक्षां मानवाचें हें निसर्गदत्त व्यक्तित्त्व कितीहि संपन्न असलें तरी तें शूद्र व्यक्तित्त्व आहे, ही गोष्ट आपण सर्वांनी कधीहि नजरेआड होऊं देऊं नयें. ‘‘जन्मना जायते शूद्रः संस्कारात् द्विज उच्चते’’ या तत्त्वानुसार पहिल्या व्यक्तित्त्वाचा लोप होऊन अत्यन्त उच्च्य स्थिती प्राप्त होण्यासाठीं अनेक वर्षांच्या साधनेची जरूरी आहे. प्रतिवर्षी आमची ही साधना चालूं आहे. म्हणून नवीन संवत्सरांत वर्षप्रतिपदेला गुढी उभारून आमची ही साधना आम्ही तशीच पुढे सुरूं ठेवतो.

आतां 'हुताशनी पौर्णिमा' ह्या फाल्गुन महिन्यांत येणाऱ्या या सणाचें, या दिवसाचें हिंदू जीवनांत काय महत्व आहे, तें विशद करतो—

केशवसुतांची एक कविता आहे, 'तुतारी'. त्यांत ते म्हणतात,

जुने जाऊ द्या मरणालागुनी
जाळुनी किंवा पुरूनी टाका
सडत न एका ठायीं टाका
सावध ऐका पुढल्या हाका
खांद्यास चला खांदा भिडवुनी

या शूद्र व्यक्तित्त्वाच्या विनाशासाठीं, त्या सुदीर्घ साधनेसाठीं प्रतिवर्ष खर्ची पडत आहे. या शूद्र व्यक्तित्त्वाने आमच्या जीवनाची अतिशय हानी होते आहे म्हणून त्याला जाळून टाकायचे. ही हुताशनी पौर्णिमा. या होळीमध्यें याची आहुती देताना 'अग्नय:स्वाहा' असे म्हणत हें मी आतां सोडून दिलें, माझा याच्याशीं कांहीं संबंध राहिला नाही म्हणून 'अग्नय इदं न मम' असे म्हणायचे. त्या

मृताच्या नांवें शंख करायचा. वास्तविक अहंकारी व्यक्तित्त्व हें खरे म्हणाल तर व्यक्तित्त्वच नाही. कारण अहं हें फाल्स सेंटर आहे. अहं वेगळा आहे. व्यक्तित्त्वाशी त्याचा कांहींच संबंध नाही. व्यक्तित्त्व अस्तित्वावर उभे असते. ‘अहं’ ला स्वत:चें अस्तित्व नाहीं कारण तो केवळ अज्ञानजन्य आहे. वाघ अस्तित्वानें जगतो. अहंकाराने नाही. कारण त्याच्यापाशी ‘मी आहे’ ही जाणीवच नाही. यामुळें पशूंत जो जिवंतपणा दिसतो तो माणसांत दिसत नाही. त्यांची उर्जा संग्रहित होते. माणसाची उर्जा नक्कीच वाया जाते कारण अहंकार ही शक्ति नाही, अशक्ति आहे. पशू अवस्थेंतून उत्क्रान्त होऊन हा मानवी देह निर्माण झाला आहे. ही उत्क्रान्ति होत असताना कांहीं प्रगत अवस्था त्याला प्राप्त झाली आहे. पशूला ‘मी आहे’ ही जाणीव नाही, माणसांत ती आहे हा त्याच्यातील मुख्य प्रगत गुण आहे. मनुष्यजातींत अनंत प्रकार आहेत. प्रत्येकाच्या उन्नति अवनतिमुळेंहि अनंत प्रकार होतात. महा-

भारत काळांतील कुत्रा आणि आजचा कुत्रा यांत काय फरक आहे ? महाभारत काळ आणि आजचा काळ  या दोन्ही काळांत केवढा फरक दिसतो माणसांत! प्रगति असो नाहीतर अधोगति पण माणसांत ही क्षमता आहे, त्याला हें स्वातंत्र्य आहे. कुत्र्यांना कोणताच पर्याय कधीच उपलब्ध नसतो. मानवजात खरोखर मूर्ख आहे. आत्मोन्नतीच्या ह्या सुवर्णसंधीचें त्याने कवडीइतके मोल केले आहें.